**डॉ.होमी भाभा स्टेट विद्यापीठ, मुंबई या विद्यापीठाच्या सांविधिक व असंविधानिक नियमित पदांची निर्मिती करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन शुध्दीपत्रक क्रमांक: संकीर्ण- २०२१/प्र.क्र.१६२/विशि-३,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक: १४ ऑक्टोबर, २०२१.

**वाचा :-**

(१) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय, क्रमांकः-रुसायो-२०१८/प्र.क्र.२४८/भाग-१/विशि-३, दि.७ मार्च, २०१९.
(२) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय, क्रमांकः-रुसायो-२०१८/प्र.क्र.२४८/विशि-३, दि.३ नोव्हेंबर, २०२०.
(३) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन परिपत्रक क्रमांक: संकीर्ण-२०२१/प्र.क्र.१६२/विशि-३, दि.१४ ऑक्टोबर, २०२१.

**प्रस्तावना :-**

राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान (रुसा) अंतर्गत "Creation of Universities by Conversion of colleges in a Cluster" या घटकांतर्गत, महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ कलम ३(६) मधील तरतूदीस अनुसरुन दिनांक २० डिसेंबर, २०१८ रोजी झालेल्या मा.मंत्रीमंडळाच्या बैठकीत शासकीय विज्ञान संस्था, मुंबई (इन्स्टिट्यूट ऑफ सायन्स) हे मुख्य महाविद्यालय व सिडनहॅम कॉलेज,मुंबई, एलफिन्स्टन कॉलेज, मुंबई व शासकीय अध्यापक महाविद्यालय, मुंबई (गव्हर्नमेंट बी.एङ. कॉलेज) ही ३ सहभागी महाविद्यालये यांचा समावेश असलेले "डॉ.होमी भाभा स्टेट विद्यापीठ, मुंबई" स्थापन करण्यास मान्यता देण्यात आली आहे. त्याअनुषंगाने विद्यापीठ स्थापनेची अधिसूचना दि.१३ फेब्रुवारी, २०१९ रोजीच्या राजपत्रात प्रसिध्द करण्यात आली आहे. या समूह विद्यापीठाकरिता आवश्यक असणाऱ्या ५ सांविधिक पदांची निर्मिती संदर्भाधीन क्र.(१) येथील दि.०७.०३.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये करण्यात आली आहे. तसेच, सदर विद्यापीठाकरिता असंविधानिक नियमित भरावयाची १४ पदे व कंत्राटी पध्दतीने भरावयाची २० पदे अशी एकूण ३४ पदांची निर्मिती संदर्भाधीन क्र.(२) येथील दि.३ नोव्हेंबर, २०२० रोजीच्या शासन निर्णयाद्वारे करण्यात आली आहे. सदर सांविधिक व असंविधानिक नियमित पदांच्या वेतनाचा खर्च खर्च भागविण्यासाठी संदर्भाधीन क्र.(३) येथील शासन परिपत्रकान्वये स्वतंत्र लेखाशिर्ष मंजूर करण्यात आले आहे. त्यास अनुसरुन उपरोक्त संदर्भाधीन क्र.(१) व (२) येथील शासन निर्णयात नवीन लेखाशिर्षाचा अंतर्भाव करण्याबाबत शुध्दीपत्रक काढण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन शुध्दीपत्रक:-**

डॉ.होमी भाभा स्टेट विद्यापीठ, मुंबई या समूह विद्यापीठाकरिता संदर्भाधीन क्र. (१) येथील दि.०७.०३.२०१९ रोजीच्या शासन निर्णयातील पृष्ठ क्र.३ वरील "सदर योजनेवरील खर्च "मागणी क्रमांक-डब्ल्यु-२, प्रधानशीर्ष-२२०२- सर्वसाधारण शिक्षण, ०३- विद्यापीठीय व उच्च शिक्षण, १०२- विद्यापीठांना सहाय्य, - (०७) (०१) व (०२) राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान अंतर्गत शासकीय संस्थांना सहायक अनुदान (राज्य हिस्सा) (२२०२ आय २७२), ३१ सहाय्यक अनुदाने व (केंद्र हिस्सा) (२२०२ आय २६३), ३१ सहायक अनुदाने या लेखाशिर्षाखाली मधील मंजूर तरतुदीतून भागविण्यात येईल."

याचेऐवजी “सदर पदांच्या वेतनाचा खर्च “मागणी क्रमांक डब्ल्यू-२, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०३, विद्यापीठीय व उच्च शिक्षण, १०२, विद्यापीठांना सहाय्य, (००) (००)(३३) समूह विद्यापीठ (कार्यक्रम) (२२०२ ८०६३) ३६, सहाय्यक अनुदाने (वेतन)” या लेखाशिर्षाखाली मंजूर तरतुदीतून भागविण्यात येईल.” असे वाचावे.

२. तसेच संदर्भाधीन क्र.(२) येथील दि.३ नोव्हेंबर, २०२० रोजीच्या शासन निर्णयातील पृष्ठ क्र.३ वरील पहिल्या व दुसऱ्या परिच्छेदामध्ये पुढील परिच्छेद अंतर्भूत करण्यात यावाः-

“सदर असंविधानिक नियमित पदांचा खर्च “मागणी क्रमांक डब्ल्यू-२, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०३, विद्यापीठीय व उच्च शिक्षण, १०२, विद्यापीठांना सहाय्य, (००) (००) (३३) समूह विद्यापीठ (कार्यक्रम) (२२०२ ८०६३) ३६, सहाय्यक अनुदाने (वेतन)” या लेखाशिर्षाखाली मंजूर तरतुदीतून भागविण्यात येईल.”

सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२११०१४१५४५५५०२०८ असा आहे. हे शुध्दीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Pravinkumar Gulabrao Pawar

Digitally signed by Pravinkumar Gulabrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher and Technical Education, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8de261729f06eda4a56aba947eceb6140d7406426b2f08c9317bea2458ec1f92, serialNumber=8f18625adb482a7ee2512cea93ce697388c95a99c89e41e85c05a3de8476488f, cn=Pravinkumar Gulabrao Pawar
Date: 2021.10.18 15:37:16 +05'30'

**(प्रविणकुमार पवार)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१) मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा.मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा.राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
५) राज्य प्रकल्प संचालक, राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
७) महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर.
८) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
९) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
१०) कुलगुरु, डॉ.होमी भाभा स्टेट विद्यापीठ, मुंबई
११) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१२) कुलसचिव, डॉ.होमी भाभा स्टेट विद्यापीठ, मुंबई
१३) नियोजन विभाग (कार्यासन १४७१/१४११), मंत्रालय, मुंबई.
१४) वित्त विभाग (कार्यासन व्यय-५/कार्यासन अर्थ-८), मंत्रालय, मुंबई.
१५) उप सचिव (विशि), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१६) कार्यासन अधिकारी (साशि-१), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७) निवड नस्ती (विशि-३).